**सन २०१९-२० मध्ये प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत -प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत एखाद्या क्षेत्रावर सुक्ष्म सिंचनाचा लाभ घेतलयानंतर ७ वर्ष कालावधीनंतर पुन्हा सुक्ष्म सिंचनासाठी लाभ अनुज्ञेय करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१/१४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: २४ फेब्रुवारी, २०२०

**संदर्भ:-**

१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.

२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१/१४-अे, दि.३० ऑगस्ट, २०१९.

**प्रस्तावना:**

सन २०१४-१५ पर्यंत सुक्ष्म सिंचन योजना केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियानांतर्गत राबविण्यात येत होती. सन २०१५-१६ या वर्षापासून सूक्ष्म सिंचन योजना प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेच्या प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकांतर्गत राबविण्यात येत आहे. राष्ट्रीय सूक्ष्म सिंचन अभियानाच्या मार्गदर्शक सुचनांनूसार, सुक्ष्म सिंचनासाठी अनुदानाचा लाभ घेतलेल्या क्षेत्रावर १० वर्षाच्या कालावधीनंतर सुक्ष्म सिंचनासाठी पुन्हा अनुदानाचा लाभ अनुज्ञेय होता. परंतु, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेच्या प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या मार्गदर्शक सुचनांनूसार, ७ वर्षाच्या कालावधीनंतर अनुदानाचा लाभ अनुज्ञेय केलेला आहे. सबब, संदर्भाधीन दि.३० ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयातील अनुक्रमांक-३ (VIII) येथील अट रद्द करुन, एखाद्या क्षेत्रावर सुक्ष्म सिंचनाचा लाभ घेऊन ७ वर्षाचा कालावधी पुर्ण झाल्यानंतर त्याच क्षेत्रावर पुन्हा सुक्ष्म सिंचनासाठी अनुदानाचा लाभ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. संदर्भाधीन दि.३० ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयातीली अनु.क्र.३ (VIII) येथील तरतूद रद्द करण्यात येत आहे.

२. शेतकऱ्याने एखाद्या क्षेत्रावर यापूर्वी सुक्ष्म सिंचनासाठी अनुदानाचा लाभ घेतला असेल तर त्याच क्षेत्रावर ७ वर्षाच्या कालावधी नंतर प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेच्या- प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) घटकांतर्गत अनुदानाचा लाभ अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२४१३१११११६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.02.24 13:17:18 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषी / फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (कृषी व पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (कृषी) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (जलसंधारण व रोजगार हमी योजना), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) जिल्हाधिकारी (सर्व)
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
११) संशोधन संचालक, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी
१२) संशोधन संचालक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
१३) संशोधन संचालक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली
१४) संशोधन संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला
१५) सर्व संचालक, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६) सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१७) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१८) सर्व कृषी विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी/
१९) सर्व मंडळ कृषी अधिकारी

२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
२२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२३) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२४) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२५) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
२६) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण /नाशिक /पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
२७) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२८) निवड नस्ती (१४-अे)